**मौजे पाली मराठवाडी, गुरववाडी नळ पाणी पुरवठा योजना ता.व जि. रत्नागिरी या वाढीव दरडोई खर्च असलेल्या योजनेस प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ग्रापापु १३१४/प्र.क्र.५५ पापु-०६**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख : ०१ सप्टेंबर, २०१४

<u>वाचा -</u>

१) शासन निर्णय क्रमांकः ग्रापापु ११०९/१०४ अ/पापु-०७,दि.१७.०३.२०१०
२) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१२१३/प्र.क्र.३५/पापु-०७,दि.१६ जुलै,२०१३
३) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१२०८/प्र.क्र.५२/पापु-०७,दि.९ ऑक्टोबर,२०१३
४) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१११४./प्र.क्र.२२/पापु-०७,दि.९ जुलै,२०१४
५) मु.का.अ.जि.प.रत्नागिरी यांचे पत्र क्र.रजिप / ग्रापापु / तांशा-२ / ३२७७, दि.२०/०५/२०१४

<u>प्रस्तावना -</u>

मौजे पाली मराठवाडी, गुरववाडी नळ पाणी पुरवठा योजना ता.व जि. रत्नागिरी या पाणी पुरवठा योजनेच्या प्रस्तावास ग्रामपंचायत ठराव क्र.४४ (०२) दि.१० /०२/२०१४ नुसार प्रशासकीय मान्यता दिली आहे. योजनेस कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा जिल्हा परिषद, रत्नागिरी यांनी अ.क्र.०५ /माहे मे, २०१४ अन्वये तांत्रिक मंजूरी दिलेली आहे. योजनेचा दरडोई खर्च वाढल्यामुळे सदरचा प्रस्ताव जिल्हा परिषदेने शासनाच्या मान्यतेकरीता सादर केलेला आहे. वाढीव दरडोई खर्च असलेल्या पाणी पुरवठा योजनेस प्रशासकीय मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

<u>**शासन निर्णय:-**</u>

वरील प्रस्तावनेच्या अनुषंगाने मौजे पाली मराठवाडी, गुरववाडी नळ पाणी पुरवठा योजना ता.व जि. रत्नागिरी या पाणी पुरवठा योजनेच्या रु. ४३५८/- एवढया वाढीव दरडोई खर्च असलेल्या योजनेच्या रु. २५,७०,१७५/- (ढोबळ) (पंचवीस लाख सत्तर हजार एकशे पंच्याहत्तर फक्त) इतक्या ढोबळ किमतीच्या अंदाजपत्रकास व आराखड्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

राज्यातील ग्रामीण पाणी पुरवठा योजनांसाठी लोकवर्गणीचे धोरण शासन निर्णय क्रमांक :ग्रापाधो १११४/प्र.क्र.२२/पापु-०७, दि. ९ जुलै, २०१४ अन्वये लोकवर्गणीची अट रद्द करण्यात आली आहे.

सदर योजनेस खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१) सदर योजनेची अंमलबजावणी ग्रामपंचायत/ग्राम पाणी पुरवठा व स्वच्छता समिती यांनी करावी योजना पुर्ण झाल्यानंतर ती यशस्वीरित्या पूर्ण झालेली आहे, याची खात्री ग्रामपंचायतीने करावयाची असून योजना पुर्ण होऊन चाचणी झाल्यानंतर योजनेची देखभाल दुरुस्ती ग्रामपंचायत / ग्राम पाणी पुरवठा व स्वच्छता समिती करेल.
२) योजना चालविण्यासाठी व देखभाल दुरुस्तीसाठी येणारा खर्च भागविण्याकरिता संबधीत ग्रामपंचायतीने खाजगी नळ धारकांसाठी किमान वार्षिक पाणी पट्टी रु. ११००/- इतकी

आकारण्यात यावी व त्यात वार्षिक १०% वाढ करण्यात यावी. या पाणीपट्टी वसुलीतून योजनेची देखभाल दुरुस्ती करावी, त्यासाठी शासनातर्फे अनुदान देण्यात येणार नाही.

३) योजनेचे स्त्रोत बळकटीकरण करण्यात यावे. तसेच योजनेमध्ये १०० टक्के घरगुती नळजोडण्यांचा समावेश करण्यात यावा.

४) प्रचलित धोरणानुसार हागणदारी मुक्ती अभियान राबविणेत यावे.

५) कोणत्याही कारणाने योजनेच्या खर्चात वाढ झाल्यास वाढीव खर्चापोटी शासकीय अनुदान उपलब्ध करुन दिले जाणार नाही.

६) दरडोई खर्चाचे निकषात योजना नसल्यामुळे कोणत्याही परिस्थितीत योजनेचे काम मंजूर किंमतीत पुर्ण करावे. त्यासाठी कालबध्द व नियोजनबध्द पध्दतीने कार्यवाही करावी.

७) योजनेची कामे टप्प्या-टप्प्याने करावीत. उद्भव विकसीत झाल्याशिवाय इतर कामे करु नयेत.

८) जास्त किंमतीच्या निविदा स्वीकृत करण्यापूर्वी पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाची परवानगी घ्यावी. परवानगी शिवाय योजनेची कामे सुरु करण्यात येवू नयेत.

९) योजना स्वयंनिर्भर होण्यासाठी आवश्यक पाणी पट्टी बसविणे व त्यात वाढ करणे बंधनकारक राहील, याबाबत जिल्हा परिषदेच्या अधिकाऱ्यांनी ग्रामसभेत ग्रामस्थांना सविस्तर माहिती स्पष्टपणे द्यावी, व त्यानंतरच योजनेच्या कामास सुरवात करावी.

१०) सदर योजनेच्या तांत्रिक मान्यतेतील अटींची तसेच राष्ट्रीय पेयजल कार्यक्रमा अंतर्गत मार्गदर्शक सूचनांची व प्रचलीत अटींची पूर्तता करणेत यावी.

११) सदर योजनेचा समावेश सन २०१४-१५ च्या कृती आराखड्यात आहे, याबाबतची खात्री जिल्हा परिषदेने करावी.

१२) मंजूर केलेल्या योजनेत शासनाच्या पूर्वपरवानगीशिवाय तांत्रिक बदल करण्यात येवू नये.

१३) योजना मंजूर किंमतीत पूर्ण करण्यात यावी.

४. या योजनेवर होणारा खर्च जिल्हा परिषदेला प्राप्त होणाऱ्या राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमाअंतर्गत केंद्र तथा राज्य निधीतून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९०११४२९४५१३२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PATIL DEELIP P

Digitally signed by PATIL DEELIP P
DN: c=IN, o=Govt Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation, postalCode=400001, st=: Maharashtra, cn=PATIL DEELIP P
Date: 2014.09.01 14:25:08 +05'30'

**( दिलीप पां. पाटील)**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. सदस्य सचिव,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर्स, मुंबई-२१

२. विभागीय आयुक्त, कोकण विभाग, नवी मुंबई,

३. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
४. जिल्हाधिकारी, रत्नागिरी
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रत्नागिरी
६. मुख्य अभियंता (नागरी व ग्रामीण),महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, ठाणे
७. वित्तीय सल्लागार व मुख्य लेखाधिकारी, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, ठाणे/नवी मुंबई
८. अधीक्षक अभियंता (नागरी व ग्रामीण), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, ठाणे
९. संचालक, भुजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पी.एम.टी.बिल्डींग, स्वारगेट, पुणे
१०. उपसंचालक, भुजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, रत्नागिरी
११. वरिष्ठ भुवैज्ञानिक, भुजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, रत्नागिरी
१२. कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण बांधकाम विभाग, रत्नागिरी
१३. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, रत्नागिरी
१४. ग्रंथपाल, ग्रंथालय, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई (२ प्रती)
१५. मा.मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१६. मा.राज्यमंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१७. प्रधान सचिव (पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१८. मुख्य अभियंता तथा विशेष कार्य अधिकारी, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
१९. कार्यासन पापु-०४, ०५, ०९, १३, १७, १८, संगणक कक्ष, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
२०. निवडनस्ती (कार्यासन पापु-०६) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.